कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "शहर अभियंता" या पदावर श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली), अधीक्षक अभियंता यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
**शासन आदेश क्रमांक:- कडोंम-१०१८/प्र.क्र.८२/१८/नवि-२८**
मुख्य इमारत, ४ था मजला, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ:- १) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र.क.डों./साप्र/मुका/टे-१०/ प्र.क्र.३५६/२३७, दि.१७.०४.२०१८.
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र.पीओजी-१२१७/प्र.क्र.१६६ (३)/सेवा-१, दि.०२.०७.२०१८.

प्रस्तावना:-

आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी त्यांच्या दि.१७.०४.२०१८ च्या पत्रान्वये महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील मंजूर व रिक्त "शहर अभियंता" ह्या पदावर प्रतिनियुक्तीने अधिकारी उपलब्ध करून देण्याची विनंती केली होती. त्याअनुषंगाने विभागाच्या टिप्पणीद्वारे सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भीय दि.०२.०७.२०१८ च्या आदेशाद्वारे श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली), अधीक्षक अभियंता यांची प्रतिनियुक्तीने नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील "शहर अभियंता" या रिक्त व मंजूर पदावर त्यांच्या सेवा आदेशात नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून नियुक्ती केलेली आहे. त्याअनुषंगाने श्रीमती कोळी यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन आदेश विहित करण्यात येत आहे:-

**शासन आदेश:-**

कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील मंजूर व रिक्त असलेल्या "शहर अभियंता" या पदावर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भीय दि.०२.०७.२०१८ च्या शासन आदेशाचे अनुषंगाने श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली), अधीक्षक अभियंता यांची प्रथमत: १ वर्षासाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली) यांची सदर पदावरील प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट-२ मध्ये विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली) यांच्या शहर अभियंता, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका या पदावरील प्रतिनियुक्तीच्या सेवांबाबतच्या अन्य अटी व शर्ती सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भीय दि.०२.०७.२०१८ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१८११२२१५२४४३३७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji
Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff,
serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2018.11.30 15:41:40 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव ( नवि-२ ) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जिल्हा-ठाणे.
६) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई.
७) जिल्हाधिकारी, ठाणे.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
९) श्रीमती सपना वि. कोळी (देवनपल्ली), अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवडनस्ती ( नवि-२८ ).